सहकार विभागाची एकच परिपूर्ण वेबसाईट विकसित करण्यासाठी निवड करण्यात आलेल्या M/s PwC या कंपनीच्या सल्लागारांचे माहे मार्च २०२३ पर्यंतचे देयक अदा करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पूरक-२०२२/प्र.क्र.३८/१६-स

नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ३१ मार्च, २०२३.

**वाचा:**

१) माहिती व तंत्रज्ञान विभाग शासन निर्णय क्र.GAD- मातंस ०८०/२०१४-O/o Directorate of IT-DIT(MH), दि.९.५.२०१९.

२) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.पुरक १९२२/प्र.क्र.२६/२०२२/१७ स, दि.३०.८.२०२२.

३) शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.०४.२०१५.

४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.१४४/२०१८/कोषा प्रशा-५, दि.२८.९.२०१८.

५) वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ ६६३/२०२२ दि.२९.१२.२०२२

**प्रस्तावना:**

सहकार विभागाच्या विविध वेबसाइट ऐवजी एकच परिपूर्ण वेबसाइट तयार करण्यासाठी नियुक्त केलेल्या मे.PwC या संस्थेच्या चार सल्लागारांचे माहे मार्च २०२३ या कालावधीचे वेतन देयक मागणी क्र.व्ही-२, मुख्य लेखाशिर्ष ३४५१, सचिवालयीन आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०२)(०३),ई-गर्व्हनन्स कार्यक्रम (सहकार) (कार्यक्रम) (३४५१ २७५५), १७-संगणक खर्च अंतर्गत अदा करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या दि.०९ मे २०१९ च्या शासन निर्णयानुसार सल्लागारांचा माहे मार्च २०२३ पर्यंतच्या व्यवसायिक सेवेचे शुल्क अदा करण्यासाठीची देयके M/s PwC या संस्थेने सादर केली आहेत. सदर सल्लागारांच्या त्यांच्या उपस्थितीनुसार दरमहा व्यवसायिक सेवेचे शुल्क याचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-

| सल्लागाराचे नाव | मार्च, २०२३ |
|---|---|
| व्यवस्थापकीय सल्लागार (प्रकल्प व्यवस्थापक) | ३०६९०० |
| व्यवस्थापकीय सल्लागार | ३०६९०० |
| वरिष्ठ सल्लागार | २७७२०० |
| सल्लागार | २४७५०० |
| **एकूण** | ११३८५०० |
| **९% GST** | १०२४६५ |
| **९% CGST** | १०२४६५ |
| एकूण देय रक्कम (GST/CGST सह) | १३४३४३० |

२. M/s PwC यांच्या उपरोक्त नमूद कालावधीच्या एकूण रक्कम **रु.१३,४३,४३०/- (अक्षरी रुपये तेरा लाख त्रेचाळीस हजार चारशे तीस फक्त) इतक्या खर्चाच्या देयकास मंजूरी देण्यात येत आहे.**

३. देयकाच्या एकूण रु. १३,४३,४३०/- एवढ्या रकमेतून १८ % GST रक्कम रु.२,०४,९३०/- वगळून उर्वरित रु.११,३८,५०० /- एवढया रकमेवर १०% आयकर रु.१,१३,८५०/- इतकी रक्कम वजा करण्यात येत आहे. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.१४४/२०१८/कोषा प्रशा-५, दि.२८.९.२०१८ नुसार रु.२,५०,०००/- वरील देयक असल्यास देय रकमेतून २ % TDS वजा करणे आवश्यक आहे. सन २०२२-२३ या वर्षातील M/s PwC यांना अदा करावयाच्या सर्व देयकांची रक्कम रु.२,५०,०००/- पेक्षा जास्त असल्याने सदर देयकाच्या मुळ रु.११,३८,५००/- एवढया रकमेवर २% TDS रु.२२,७७०/- एवढी रक्कम वजा करण्यात येवून उर्वरित रक्कम **रु.१२,०६,८१०/- (अक्षरी रुपये बारा लाख सहा हजार आठशे दहा फक्त) इतकी रक्कम M/s PwC यांना अदा करण्यात यावी.** तसेच, TDS कपात केल्याचे प्रमाणपत्र त्यांना देण्यात यावे. याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

| बाब | एकूण रक्कम |
|---|---|
| देयकाची मुळ रक्कम | रु.११,३८,५००/- |
| १८ % GST (९% CGST + ९ % SGST) ची रक्कम | रु.२,०४,९३०/- |
| GST सह एकूण | रु.१३,४३,४३०/- |
| १८ % GST रक्कम वगळून रु.२२,५७,२००/- या रकमेवर १० % आयकर | (-)रु.१,१३,८५०/- |
| रु.२,२५,७००/- एवढया रकमेवर २ % GST कपात (SGST १ % रु.२२५७२/- + CGST १ % रु.२२,५७२/-) | (-) रु.२२,७७०/- |
| एकूण देय रक्कम रुपये तेवीस लाख ब्यान्नव हजार सहाशे बत्तीस फक्त | **रु.१२,०६,८१०/-** |

४. सदर खर्च "मागणी क्र.व्ही-२, मुख्य लेखाशिर्ष- ३४५१, सचिवालयीन आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०२)(०३), ई-गर्व्हनन्स कार्यक्रम (सहकार) (कार्यक्रम) (३४५१ २७५५), १७-संगणक खर्च"

या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर पुरक मागणी रक्कमेतून भागविण्यात यावा.

सदरहू रक्कम खालील बँक खात्यावर RTGS/ NEFT द्वारे M/s PwC यांना अदा करण्यात यावी.

| | | |
|---|---|---|
| १. | Beneficiary Account Name | PricewaterhouseCoopers Private Limited |
| २. | Bank Name | Citibank NA |
| ३. | A/c No. | 712912006 |
| ४. | IFSC Code | CITI0000002 |
| ५. | Branch Name | New Delhi |
| ६. | Company Pan | AABCP9181H |
| ७. | Company GST No. | 27AABCP9181H1Z4 |

५. या शासन ज्ञापनान्वये मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना संवितरित करण्याकरिता श्री. सु. ल. काठोळे, कार्यासन अधिकारी (रोखशाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. तसेच, (व्ही-०११) श्री. नितीन गायकवाड, उप सचिव (अर्थसंकल्प), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई हे “नियंत्रण अधिकारी” असतील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ च्या परिशिष्टामधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग - तीनच्या अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र. २७ (२) तसेच उपविभाग - चारच्या अनुक्रमांक ११ नुसार विभागास प्राप्त असलेल्या अधिकारानुसार व विभागाच्या ई- गव्हर्नन्स योजनेच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिलेल्या मान्यतेनुसार तसेच नियोजन विभाग अनौ.सं.क्र. ४४५/का.१४३१, दि.१६ डिसेंबर, २०२२ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६६३/२०२२, दि.२९ डिसेंबर, २०२२ अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच्या संकेतांक २०२३०४०३१७१५१४७१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN VASANTRAO GAIKWAD

Digitally signed by NITIN VASANTRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=5892c3fd8686c1921e784a3faa9888d155b03f5591ce11b21a1b5006247f6972, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2276AC762AF372D872C2F01D5BB5086166F4A6E20A1BDF9762D556A93F5D118E, cn=NITIN VASANTRAO GAIKWAD
Date: 2023.04.03 17:23:08 +05'30'

**( नितीन गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. संचालक, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अ.मु.स. (सहकार व पणन) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६. उपसचिव (अर्थसंकल्प), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
८. कक्ष अधिकारी, रोखशाखा(२ प्रती), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, व्यय-२/वित्तीय सुधारणा, मंत्रालय,मुंबई.
१०.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, का-१४३१, मंत्रालय,मुंबई.
११.श्री.अल्पेश कंकारीया, भागीदार, PricewaterhouseCoopers private Limited (PwC), मुंबई- ४०० ०२८.
१२.निवड नस्ती, १६-स संग्रहार्थ.